उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळातील जिल्हा आरोग्य अधिकारी संवर्गातील अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः पदआ २०२०/प्र.क्र.७३/ आरोग्य-३

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१.
दिनांक : १८ सप्टेंबर, २०२०

वाचा -

१) शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक: पदआ-२०२०/प्र.क्र.७३/आरोग्य-३, दिनांक-१९.०३.२०२०.
२) आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक- संआसे/मवैआसे/कक्ष-१/टे-५ /न.क्र.अ.प.१/अस्थाई पदे/जिआअ. नागपूर/७३७/२०२०, दिनांक- २४.०२.२०२०.

## शासन निर्णय-

उपरोक्त संदर्भाधीन अ.क्र. १ येथील शासन निर्णयान्वये उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळ, नागपूर अंतर्गत जिल्हा आरोग्य अधिकारी संवर्गातील (१) जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, गडचिरोली (२) जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, गोंदिया (३) अतिरिक्त जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, गोंदिया (४) सहाय्यक जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, गोंदिया या ४ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२० ते दि. ३१.०८.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे.

२. आता या शासन निर्णयान्वये उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळ, नागपूर अंतर्गत जिल्हा आरोग्य अधिकारी संवर्गातील (१) जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, गडचिरोली (२) जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, गोंदिया (३) अतिरिक्त जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, गोंदिया (४) सहाय्यक जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, गोंदिया या ४ अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२० ते दि. २८.०२.२०२१ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर पदांवरील खर्च खालील लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०२०-२०२१ या वर्षाकरीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक-आर-१**

२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०१ - नागरी आरोग्य सेवा व विषम चिकित्सा
११० - रुग्णालये व दवाखाने
११० -७ - पंचवार्षिक योजनाअंतर्गत योजना-
राज्य योजनाअंतर्गत योजना
(०६)(०१) - मुसफल क्षेत्रातील अध्यापनेतर शासकीय रुग्णालये (२२१० ०३६२)

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक,दि. ३१.०८.२०२० च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९१८११३२४१६३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2020.09.18 17:29:35 +05'30'

**(रो.दि.कदम-पाटील)**
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक, आरोग्यसेवा, मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा(रुग्णालये- राज्यस्तर) मुंबई.
५. सहसंचालक, आरोग्य सेवा(अर्थ व प्रशासन) मुंबई.

६. उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळ.

७. जिल्हा आरोग्य अधिकारी, गडचिरोली/गोंदिया.

८. जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली/गोंदिया.

९. वित्त विभाग,(व्यय-१३) मंत्रालय,मुंबई.

१०.कार्यासन अधिकारी, सेवा-२/सेवा-३/सेवा-५/अर्थसंकल्प,सा.आ.वि.मंत्रालय,मुंबई.

११.निवडनस्ती (आरोग्य-३)